महाराष्ट्र शासन

**क्रमांक :** जीईएन १०९८/१३५७/प्र.क्र.१६६/९८/नवि-२४
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

**दिनांक :** ३ नोव्हेंबर २००३

**प्रति,**

आयुक्त ,
सर्व महानगरपालिका
महाराष्ट्र

**विषय : महानगरपालिकांनी त्यांचेमार्फत देण्यात येणाऱ्या कंत्राटी कामांचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविणेबाबत**

संदर्भ :-१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विकास १०९८/ प्रक्र २८८९/शासन हमी, दिनांक १९.८.१९९८

२) शासन पत्र नगर विकास विभाग क्र.जीईएन १०९८/ १३५७/प्र.क्र.१६५/९८/नवि-२४,दि.१.२.१९९९

**महोदय,**

शासन निर्णय,वित्त विभाग दि.१९.८.१९९८ अन्वये राज्यातील निरनिराळे शासकीय व निमशासकीय विभाग,महामंडळे,मंडळे,सार्वजनिक उपक्रम/संस्था, नगरपालिका, महानगरपालिका तसेच सर्व जिल्हा परिषदा,पचायत समित्या व ग्रामपंचायती यांनी त्यांच्या विविध योजनांतर्गत देण्यात येणाऱ्या कंत्राटी कामांचा विमा व्यवहार फक्त शासकीय विमा निधीकडे करण्याचे आदेश निर्गमित केले असून विभागाच्या दि. १ फेब्रुवारी १९९९ च्या पत्रान्वये राज्यातील महानगरपालिकांनी त्यांच्या सर्व मालमत्तेचा विमा शासकीय विमा निधी यांचेकडे उतरविणे आवश्यक असल्याच्या सुचना सर्व महानगरपालिका आयुक्तांना दिल्या आहेत. तथापि राज्यातील बृहन्मुंबई,नवी मुंबई,पुणे या महानगरपालिका वगळता उर्वरित महानगरपालिकांमधून याबाबत पुरेशा गांभीर्याने कार्यवाही होत नसल्याचे दिसून येते.

शासनाचा महसूल वाढविण्यासाठी तसेच शासनाच्या विमा धोरणाची अंमलबजावणी परिणामकारकपणे होऊन राज्यातील महानगरपालिकांना विमापत्रावरील अतिरिक्त आर्थिक सुरक्षिततेचा फायदा मिळण्यासाठी प्रत्येक कंत्राटी कामाचा विमा वित्तीय शिस्तीची बाब म्हणून शासकीय विमा निधीकडे उतरविणे आवश्यक आहे.

यासाठी महानगरपालिकांनी प्रत्येक प्रकारच्या कंत्राटी कामाच्या करारनाम्यात पुढीलप्रमाणे विमा अट अंतर्भूत करावी :-

" कंत्राटदारावर सोपविलेल्या कंत्राटकामाचा विमा कंत्राटदारांनी विमा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,गृहनिर्माण भवन,२६४,पहिला मजला, कला नगरसमोर, वांद्रे (पूर्व),मुंबई - ४०० ०५१ (दूरध्वनी क्र.२६५९०४०३/ २६५९०६९० व फॅक्स क्रमांक ६५९२४६१) या कार्यालयापाशी कंत्राटाच्या संपूर्ण रकमेस व कंत्राटाच्या पूर्ण कालावधीसाठी विमा संचालनालयाने निश्चित केलेल्या (उदाहरणार्थ कंत्राटदाराच्या संपूर्ण जोखिमीचे विमा पत्र,उभारणी जोखीम विमापत्र इत्यादी) विमा पत्राखाली उतरविणे सक्तीचे आहे. तसेच कंत्राटी काम पूर्ण करण्यासाठी नियुक्त करण्यात येत असलेल्या सर्व कामगारांचा विमा कामगार नुकसान भरपाई विमापत्राखाली उतरविणे अनिवार्य आहे. विमा संचालनालयाच्या व्यतिरिक्त अन्य विमा कंपन्याकडून घेतलेली विमापत्रे स्विकारली जाणार नाहीत.

जर कोणत्याही कंत्राटदाराने उपरोक्त पध्दतीने विमापत्र न घेता परस्पर विमा कंपनीकडून विमापत्र घेतल्यास विमा संचालनालयाने कळविलेली विमा हप्त्याची रक्कम कंत्राटदारास कंत्राटकामापोटी देय असलेल्या रकमेतून वसूल करण्यात येईल."

राज्य शासनाची विमा योजना यशस्वी करण्यासाठी प्रत्येक महानगरपालिकेने खालीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरणे महानगरपालिकेच्या व शासनाच्या हितावह होईल.

१) प्रत्येक प्रकारच्या कंत्राटी कामाचे स्विकारपत्र व कार्यादेश कंत्राटदाराला निर्गमित करताना त्याची एक प्रत शासकीय विमा निधी या कार्यालयास अग्रेषित करावी.

२) कंत्राटी कामापोटी कंत्राटदारास रक्कम प्रदान करण्यापूर्वी कंत्राटदाराने कंत्राटी कामाचा विमा योग्य प्रकारे शासकीय विमानिधीकडे उतरवून या संबंधिचा पुरावा सादर केलेला आहे याची खात्री करावी. तद्नंतरच कंत्राटी कामापोटीची देय रक्कम प्रदान करावी.

३) काही विशिष्ट परिस्थितीत कंत्राटदारास कंत्राटी कामाची देय रक्कम प्रदान करण्याची तातडीची आवश्यकता भासल्यास कंत्राटी कामाच्या मुल्याच्या सरासरी अंदाजे रु.१/- (प्रतिशेकडा) या दराने रक्कम वळती करुन उर्वरित रक्कम प्रदान करण्यात यावी व नंतर शासकीय विमानिधीकडे ही रक्कम धनादेश वा धनाकर्षाद्वारे विमा उतरविण्यासाठी हस्तांतरीत करण्यात यावी.

४) विमा उतरविण्यासाठी विहीत नमुन्यातील माहिती उपलब्ध झाल्यानंतर शासकीय विमानिधी प्रत्येक कंत्राटी कामापोटी प्रदान करावयाची अंतिम रक्कम कळवू शकेल. या रकमेचे समायोजन वरील परिच्छेदात नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार कंत्राटदाराच्या देयकातून वळती केलेल्या व विमा निधी कार्यालयाकडे हस्तांतरीत केलेल्या रकमेशी करण्यात येईल. विमाहप्ता रक्कम अतिरिक्त भरलेली असल्यास ती परत करण्यात येईल. तसेच ही रक्कम कमी भासल्यास महानगरपालिकेने उर्वरित विमा

हप्त्याची रक्कम कंत्राटदाराच्या देयकातून वळती करून प्रदान करण्यास शासकीय विमानिधीस सहकार्य करणे आवश्यक आहे.

७) विमा पत्रकाखाली कोणत्याही प्रकारचा विमा दावा उद्भवल्यास विमापत्रक संयुक्त नावाने निर्गमित केलेले असल्याने संबंधीत महानगरपालिकेस विमादाव्याची रक्कम प्रदान केलेली असली तरी प्रकर्ता या नात्याने महानगरपालिकेचे ना हरकत प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय विमादाव्याची रक्कम विमापत्राखाली कंत्राटदारास मिळणार नाही. तेव्हा अशाप्रकारे संबंधित महानगरपालिकेचे आर्थिक हितसंबंध विमापत्राखाली सुरक्षित राहत असल्याने सर्व महानगरपालिकांनी शासन निर्णयानुसार कंत्राटदार योग्यप्रकारे शासकीय विमानिधीकडे विमा उतरवित आहेत यासंबंधी दक्षता बाळगणे आवश्यक आहे.

८) शासकीय विमानिधी या कार्यालयास विमाहप्ता रक्कम प्राप्त झाल्यानंतर कंत्राटी कामाचा विमा योग्य विमापत्राखाली उतरविल्यासंबंधीच्या पृष्ठयर्थ विमापत्रक अथवा विमा स्विकारपत्र निर्गमित करु शकेल.

वरील सूचनांचे कृपया काटेकोरपणे पालन करावे ही विनंती.

**आपला,**

( **प्र. मो. माळवदकर** )

**उपसचिव**

**प्रत माहितीसाठी -**

विमा संचालक, महाराष्ट्र राज्य, गृहनिर्माण भवन (म्हाडा), पहिला मजला, रु.नं. २६८, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.